देवळी पंचायत समितीच्या प्रशासकीय
इमारतीच्या मोड्युलर फर्निचरच्या कामास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.जिपई २०१०/प्र.क्र.५६(२)/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १० जून,२०१०

संदर्भ :- १.शासन निर्णय, ग्रा.वि.व ज.सं.वि.क्र.पंसई-२००७/प्र.क्र.२/पंरा-७, दि.१६जानेवारी,२००७
२.अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,वर्धा यांचे पत्र क्र.जिपव/बांध/वशि-६२३/१०,दि.१०.२.१०

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,वर्धा यांनी संदर्भीय दिनांक १०.२.२०१० च्या पत्रान्वये देवळी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीत मोड्युलर फर्निचरच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

देवळी पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारतीच्या रु.१८९.४४ लक्ष किंमतीच्या बांधकामास संदर्भीय दिनांक १६जानेवारी,२००७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सदरील बांधकाम अंतिम टप्प्यात आहे. सदरहू इमारत कार्यान्वित करण्यात दृष्टीने, त्यामध्ये मोड्युलर फर्निचर बसविण्याकामी अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., वर्धा यांनी मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि., मुंबई यांच्याकडील विहीत नमुना नकाशावर आधारीत रु. ३६.८२ लक्ष किंमतीचे मोड्युलर फर्निचरचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे.

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,वर्धा यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, एकूण रु.३५,३२,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या मोड्युलर फर्निचरच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

देवळी पंचायत समितीच्या मुख्य प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी एकूण रक्कम रुपये-३५,३२,०००/- (अक्षरी रक्कम रुपये पस्तीस लक्ष बत्तीस हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या मोड्युलर फर्निचरच्या कामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन प्रस्तुत मॉड्युलर फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

(२) तसेच माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या रेट कॉन्ट्रॅक्ट नं.डीआयटी-२००९/प्र.क्र.६०/३९, दि.१.२.२०१० नुसार या प्रकरणी संगणक साधनसामुग्री खरेदी करणे बंधनकारक राहील.

(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

(४) या कामी प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो जिल्हा परिषदेने सोसावा.

(५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

२. देवळी पंचायत समितीच्या मुख्य प्रशासकीय इमारतीच्या मोड्युलर फर्निचरच्या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT MODULAR FURNITURE FOR DEVALI P.S. AMDN. BUILDING | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (in Rupees) |
| 1 | Cost of Modular Furniture at Adminitrative Building | 2866738.00 |
| 2 | Add 7.50 % For Electrification charges | 215005.00 |
| 3 | Add 15 Nos. P.C. (Entry Level P.C. with Intel Processor @ Rs.24,993/-and Personal A 4 Laser Printer @ Rs.4185/-as per R.C.) | 450000.00 |
| | Total Rs. | 3531743.00 |
| | Say | Rs.35,32,000.00 |

३. उपरोक्त कामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील +परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००६१४१८५५३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद वर्धा
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद वर्धा
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद वर्धा
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा वर्धा
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, वर्धा
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती देवळी, जि.वर्धा.
११) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई